सैन्यातील धारातीर्थी पडलेल्या महाराष्ट्रातील अधिकारी व जवान यांच्या विधवा/ अवलंबितांना तसेच अपंगत्व प्राप्त झालेल्या अधिकारी व जवानांना आर्थिक मदत देण्याबाबत .
धारातीर्थी पडलेले जवान:- कॅप्टन प्रेमकुमार कृष्णा पाटील, जि. रत्नागिरी.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मासैम-२०१७/प्र.क्र.१०७ /२८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख : ०१.०६.२०१७.

**वाचा-**

१) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, क्र.मासैम १०९९/१६६१/प्र.क्र.१२६/९९/२८, दि. ०४.१०.२०००
२) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग,क्र.मासैक २००२/९३३/प्र.क्र.८६/२००२/२८, दिनांक ०९.१२.२००३.
३) संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांचे पत्र क्र.१६०२५/ पाटील/ सैकवि-१६,/१३३१, दिनांक १८ एप्रिल, २०१७.

**शासन निर्णय-**

संदर्भाधीन दिनांक ०४.१०.२००० च्या शासन निर्णयाव्दारे जम्मू-काश्मिर मधील नियंत्रण रेषेजवळील क्षेत्रात तसेच देशांतर्गत भागात मे, १९९९ पासून निर्माण झालेल्या युध्दजन्य तणावाच्या परिस्थितीत/ चकमकीत/मोहिमेअंतर्गत महाराष्ट्र राज्यातील सैन्यदलातील तसेच निमलष्करी दलातील गंभीररित्या जखमी होऊन अपंगत्व प्राप्त झालेल्या जवानास २० टक्के ते ४९ टक्यापर्यंत १.००/- लक्ष आणि ५० टक्के किंवा त्यापेक्षा अधिक असल्यास ३.००/- लक्ष/ धारातीर्थी पडलेल्या जवानांच्या विधवांना/अवलंबितांना प्रत्येकी रु.५.०० लक्ष याप्रमाणे एकवेळची आर्थिक मदत देण्यात यावी तसेच, संदर्भाधिन दिनांक ०९/१२/२००३ च्या शासन निर्णयानुसार, दिनांक १९.११.२००३ नंतर धारातीर्थी पडलेल्या जवानांच्या कुटुंबियांना देण्यात येणा-या रु.५.०० लक्ष आर्थिक मदतीची विभागणी प्रसंगानुरुप विधवा पत्नी / आई/वडील/भाऊ/बहिण यांच्यामध्ये करण्यात यावी, असा धोरणात्मक निर्णय शासनाने घेतला आहे. त्यानुसार संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांनी संदर्भाधीन दिनांक **दि. १८ एप्रिल, २०१७ च्या** पत्रान्वये शासनास सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरुन खालील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे धारातीर्थी पडलेल्या जवानांच्या विधवा/ अवलंबितांना आर्थिक मदत देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे:-

| नाव व पत्ता | मृत्यु दिनांक, मोहिम व ठिकाण | वारसाचे नांव व आर्थिक मदतीची रक्कम |
|---|---|---|
| आयसी ७१९६९ एस कॅप्टन **प्रेमकुमार कृष्णा पाटील** , मु. जांभवली, पो.हसोळ, ता राजापूर, जि. रत्नागिरी | ७ ऑगस्ट, २०१५ नौशेरा नार, ता. गुरेझ, जि. बांदीपूर (जम्मु- काश्मिर) | १. सौ. राधा कृष्णा पाटील (वीरमाता) रु.२.५० लाख<br>२. श्री. कृष्णा परशुराम पाटील,( वीरपीता) रु.२.५० लाख<br>मु. जांभवली, पो.हसोळ, ता राजापूर, जि. रत्नागिरी |
| | **एकूण** | **रुपये ५.०० /- लक्ष** |

२. धारातीर्थी पडलेल्या जवानांना अनुज्ञेय ठरविलेल्या रक्कमेपैकी ४० % म्हणजे रु. २,००,०००/- ( रु. दोन लक्ष फक्त) शासकीय अनुदानातून तर उर्वरित ६० % रक्कम म्हणजे रुपये ३,००,०००/- ( तीन लक्ष फक्त) मुख्यमंत्री सहायता (कारगिल) निधीतून घेण्यात आलेल्या व राष्ट्रीयीकृत बँकेत सद्यस्थितीत गुंतविण्यात आलेल्या रु.४२,२१,७२,०००/- कोटी रकमेच्या व्याजातून अदा करण्यात यावी.

३. वरील परिच्छेद क्र. २ मध्ये नमूद शासन अनुदानातून द्यावयाच्या रकमेपोटी होणारा खर्च रु. २००,०००/- (रुपये दोन लक्ष फक्त) हा मागणी क्र. ए-५ लेखाशीर्ष "२२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ६० - इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम, १०२ - सामाजिक सुरक्षा योजनेखाली निवृत्तीवेतने, (००)(०४) देशांतर्गत सुरक्षासंबंधी मोहिमेत-चकमकीत धारातीर्थी पडलेल्या जवानांच्या विधवांना/अवलंबितांना आर्थिक मदत (२२३५२६०८) ५० - इतर खर्च " या लेखाशीर्षाखाली सन २०१७-२०१८ या वित्तीय वर्षाकरिता मंजूर रु. ४०,००,०००/- (रुपये चाळीस लक्ष फक्त) इतक्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. प्रस्तुत प्रकरणी 'आहरण व संवितरण अधिकारी', म्हणून अनुक्रमे जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी रत्नागिरी यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. धारातीर्थी पडलेल्या जवानांच्या विधवांना/अवलंबितांना द्यावयाची आर्थिक मदत ECS द्वारे देण्यात यावी व त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करण्यात यावा.

५. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या सहमतीने निर्गमित केलेल्या शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मासैम१०९९/१६६१/प्र.क्र.१२६/९९/२८, दिनांक ४.१०.२००० मधील मार्गदर्शक तत्वांचा अवलंब करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६१२१७२२५३५५०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kishor Mahadeo Jakate

Digitally signed by Kishor Mahadeo Jakate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=00b70645b34ddd8d92842418782eb54a6897ffe96f4da14db285f027cafa55d1, cn=Kishor Mahadeo Jakate
Date: 2017.06.12 17:19:56 +05'30'

**( कि म. जकाते )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
३. महालेखापाल (स्थानिक निकाय लेखा परीक्षा व लेखा) महाराष्ट्र, मुंबई-३२
४. कमांडर, महाराष्ट्र-गुजरात एरिया मुख्यालय, कुलाबा, मुंबई ४०० ००५,
५. जिल्हाधिकारी, **रत्नागिरी,**
६. जिल्हा कोषागार अधिकारी**, रत्नागिरी,**
७. संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे ४११ ००६ ( ५ प्रती),
८. जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, **रत्नागिरी,**
९. सह संचालक, लेखा व कोषागार, संगणक कक्ष, ५ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मुंबई ३२,
१०. सौ. राधा कृष्णा पाटील, (वीरमाता) मु. जांभवली, पो.हसोळ, ता राजापूर, जि. रत्नागिरी,
११. श्री. कृष्णा परशुराम पाटील,( वीरपीता) मु. जांभवली, पो.हसोळ, ता राजापूर, जि. रत्नागिरी.
१२. निवडनस्ती.